पारशिवनी पंचायत समिती (जि.नागपूर )
प्रशासकीय इमारतीच्या बांधकामास प्रशासकीय
मान्यता देणेबाबत....

महाराष्ट्र शासन.
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र.पंसई २०१०/प्र.क्र.७०/ पंरा-७,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- १५एप्रिल,२०१०

संदर्भ:- मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.,नागपूर यांचे पत्र क्र.जिपना/बांध/का.४(५)/२०४२/१०,दि.२६.३.२०१०

प्रस्तावना :-

मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.,नागपूर यांनी संदर्भीय दिनांक २६.३.२०१० च्या पत्रान्वये पारशिवनी पंचायत समितीची इमारत अपुरी व जुनी झालेली असल्याने त्या ठिकाणी नविन प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाचा प्रस्ताव सादर केला आहे.

पारशिवनी पंचायत समितीस्तरावर सन १९६२ च्या तुलनेत अनेक कार्यालये स्थापन झालेली असून, त्या प्रमाणात इमारतीचे बांधकाम झालेले नसल्याने ही कार्यालये अस्तित्वातील जागेत दाटीवाटीने थाटलेली आहेत व काही कार्यालये इतरत्र विखुरलेली आहेत. सद्याची इमारत अत्यंत जुनी व अपुरी आहे. ग्रामीण जनतेच्या सोयीच्या दृष्टीने सर्व कार्यालये एकाच ठिकाणी आणण्याच्या दृष्टीने नविन प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाकरीता पंचायत समितीच्या दिनांक १.१.२०१० च्या मासिक सभेमध्ये ठराव मंजूर केला आहे. नविन प्रशासकीय इमारतीसाठी मुख्य वास्तु शास्त्रज्ञ, सा.बां.विभाग, मुंबई यांच्याकडील टी/एडीएम/५५११ या नमुना नकाशानुसार बांधकामाचा आराखडा तयार करण्यात आला आहे. सदर आराखड्यानुसार एकूण १०२६.५० चौ.मी. जोता क्षेत्रफळाचे बांधकाम प्रस्तावित करण्यात आले आहे. यासाठी रु. २,१८,२४,१०७/- इतक्या किंमतीचे सविस्तर अंदाजपत्रक तयार करण्यात आले आहे. सदरील अंदाजपत्रक सन २००९-१० च्या दरसुचीवर आधारीत असून, ते उप अभियंता जि.प.(बांध.), उप विभाग, सावनेर व कार्यकारी अभियंता, बांध. जि.प. नागपूर यांनी सांक्षाकित केले आहे. मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. नागपूर यांनी प्रस्तावासोबत ठरावाची प्रत, नमुना नकाशाची प्रत, सविस्तर अंदाजपत्रकाची प्रत, जागेचा सात-बारा उतारा, जागेचा ले आऊट प्लॅन इ. कागदपत्रे सादर केलेली आहेत.

मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.,नागपूर यांनी सादर केलेल्या प्रस्तावानुसार पारशिवनी पंचायत समितीच्या रु.१,७८,८८,०००/- इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या इमारतीच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

-: शासन निर्णय :-

पारशिवनी (जिल्हा-नागपूर ) पंचायत समितीच्या नविन प्रशासकीय इमारतीच्या एकूण रक्कम रुपये- १,७८,८८,०००/- (रुपये एक कोटी अठ्ठ्याहत्तर लक्ष अठ्ठ्याऐंशी हजार फक्त) इतक्या अंदापत्रकीय किंमतीच्या बांधकामास पुढील अटींच्या अधिन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

(१) नियोजित पारशिवनी पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीचे बांधकामाकरीता मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सा.बां.वि. मुंबई यांच्या नमुना नकाशामध्ये शासन मान्यते शिवाय कोणताही फेरबदल करण्यात येवू नये.
(२) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त दोन वर्षात पूर्ण होईल, असे संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी नियोजन करावे.
(३) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रमा किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी दक्षता घ्यावी. प्रमा किंमतीपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो पंचायत समिती/ जिल्हा परिषदेने सोसावा.
(४) प्रस्तुत प्रशासकीय इमारतीमध्ये अपंगांना सोयी-सुविधा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने रॅम्प, रेलींग व तत्सम सुविधा उपलब्ध करुन देणे बंधनकारक राहील.
(५) प्रस्तुत प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.) जि.प. यांनी दक्षता घ्यावी.

२.	पारशिवनी पंचायत समितीच्या नविन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढीलप्रमाणे आहे :-

| GENERAL ABSTRACT | | |
|---|---|---|
| Sr. | Work Details | Amount (in Rs.) |
| 1 | Cost Of Work Building | 12738552.00 |
| 2 | Add 11% For Electrification charges | 1401240.72 |
| 3 | Add 8% For Water Supply & Sanitation Charges | 1019084.16 |
| 4 | Add 6% For Price Variation | 764313.12 |
| 5 | Add 4% For Contingencies | 509542.08 |
| 6 | Add 2% For Computerisation | 254771.04 |
| 7 | Add For Rain Water Harvesting & Fire fighting | 200000.00 |
| 8 | Add For Compound Wall, Plinth Protection & Drains | 1000000.00 |
| | Total | 17887503.12 |
| | Say | Rs.1,78,88,000.00 |

३.	उपरोक्त बांधकामासाठी संबधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरुपात निधी उपलब्ध करुन दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यांत येईल. या कामावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५ ००५३)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४.	या कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास मुख्य अभियंता, सा.बां.वि. किंवा मुख्य अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो. यांच्याकडून त्वरेने तांत्रिक मान्यता घेण्यात येवून त्याची प्रत शासनास सादर करावी.

५.	प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, २९७८, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ. क्र.९ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यांत आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यांत येत आहे.

६.	प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्र.२०१००३३१२०४९३९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( चंद्रकांत ह. वडे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,
१) विभागीय आयुक्त नागपूर विभाग, नागपूर
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३) मुख्य अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो.,कॅम्प ऑफिस,मध्यवर्ती इमारत, पुणे
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद नागपूर
५) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद नागपूर
६) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद नागपूर
७) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा नागपूर
८) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
९) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा नागपूर विभाग, नागपूर
१०) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नागपूर
११) सभापती, पंचायत समिती, पारशिवनी, जिल्हा नागपूर
१२) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, पारशिवनी , जिल्हा नागपूर
१३) वित्त विभाग, (व्यय १५ / अर्थ.१६), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१४) नियोजन विभाग (का.क्र.१४११/१४७४) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१५) सार्वजनिक बांधकाम विभाग,इमारती-३, मंत्रालय मुंबई ४०० ०३२
१६) का.क्र, वित्त-१ व योजना-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१७) निवड नस्ती,कार्यासन क्र.पं.रा.७,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई